**श्री स्वामी समर्थ विडीकामगार सहकारी गृहनिर्माण संस्था, सोलापूर या संस्थेस गृहनिर्माणासाठी केंद्र शासनाप्रमाणे राज्य शासनाचे आर्थिक सहाय्य देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

गृहनिर्माण विभाग

शासन निर्णय क्रमांक : विडीका २००९/प्र.क्र.२८५(अ)/गृनिधो-१,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक :- ९ मार्च , २०११

वाचा :- १) शासन निर्णय क्रमांक : एचएसजी-१०९९/प्र.क्र.११८/गृनिधो-१,
दिनांक - १२ जुलै, २००१.

२) श्रम आणि रोजगार मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली, याचे क्र.डब्ल्यु अॅन्ड सीसी/एनजीपी/बी/३(६)२००२/३९५३,दिनांक-२७ सप्टेंबर, २००४.

३) मंत्री, श्रम आणि रोजगार, भारत सरकार, नवी दिल्ली, यांचे पत्र क्र.डिओ नं.एम ११०११/०१/२००५-डब्ल्यु-तीन, दिनांक १३ जुन, २००५.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने विडी कामगारांसाठी सुरु केलेल्या एकात्मिक गृहनिर्माण योजनेचे स्वरुप आणि अटी व शर्ती नुसार राज्य शासनाकडूनही अर्थ सहाय्य मिळावे असा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता. ही बाब विचारात घेऊन श्री स्वामी समर्थ विडीकामगार सहकारी गृहनिर्माण संस्था, सोलापूर या संस्थेस गृहनिर्माणासाठी केंद्र शासनाप्रमाणे राज्य शासनाचे आर्थिक सहाय्य देण्याबाबत शासनाने खालील प्रमाणे निर्णय घेतलेला आहे :-

**शासन निर्णय :-**

श्री स्वामी समर्थ विडीकामगार सहकारी गृहनिर्माण संस्था, सोलापूर या संस्थेच्या २७७ घरकुलांसाठी केंद्र शासनाने वरील संदर्भ क्र.२ अन्वये रु.३३,६४०/- प्रती घरकुल याप्रमाणे रु.९३,१८,२८०/- इतके आर्थिक सहाय्य मंजूर केले आहे. त्या अनुषंगाने राज्य शासनानेही प्रती घरकुल रु.३३,६४०/- प्रमाणे (सन २००७-०८) या आथिक वर्षात रु.५७,७७,६७०/- इतके अंशिक अनुदान वितरीत केले असल्याने सदर संस्थेस आता रु.३३,६४०/- प्रती घरकुल या दराने अनुदान वितरित करण्यास व विशेषबाब म्हणून नियमित करण्यास मंजूरी देण्यात येत आहे. सदर बाब अन्य प्रस्तावांसाठी पूर्वोदाहरण म्हणून समजण्यात येऊ नये.

राज्यातील विडी कामगार घरकुल योजनेवर, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरणाचे नियंत्रण राहील तसेच विभागीय मंडळाच्या अखत्यारीत येत असलेल्या विडी कामगारांच्या घरकुल योजनांवर त्या-त्या विभागीय मंडळाचे नियंत्रण राहील. विभागीय मंडळांनी योजनेच्या अनुषंगाने आवश्यक कार्यपध्दतीचा अवलंब करुन अद्ययावत माहिती ठेवावी.

अर्थसहाय्य वितरणाची पध्दती आणि विडी कामगारांची पात्रता निकष ही केंद्र शासनाच्या निकषाप्रमाणे राहील. केंद्र शासनाच्या श्रम मंत्रालयाने संबंधित गृहनिर्माण संस्थेस निधीचे पूर्ण वाटप केलेले आहे. आता शासन म्हाडा मार्फत संबंधित विडी कामगारांच्या गृहनिर्माण संस्थेस उपलब्धतेनुसार निधीचे वितरण करेल. इतर सर्व अटी व शर्ती शासन निर्णय क्र.विडीका-२०११/प्र.क्र.२५८/गृनिधो-१, दिनांक ७ मार्च, २०११ नुसार राहतील.

या योजनेंतर्गत होणारा खर्च मागणी क्र. क्यू-३,२२१६ गृहनिर्माण, (०३)(०८) विडी कामगारांना घरकुलासाठी अर्थसहाय्य ( २२१६ १२०२) ३३ अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात येईल.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनोपचारिक संदर्भ क्र.१०७/व्यय-३, दिनांक २३/२/२०११ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक -२०११०३०७१५५६४९००१आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( प्र.ल.पाठक)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१ मा. राज्यपाल यांचे सचिव.
२ मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३ मा.मंत्री, कामगार यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४ मा. राज्यमंत्री (गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
५ मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२.
६ प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,
७ वित्त विभाग (व्यय-३) मंत्रालय, मुंबई- ३२.
८ नियोजन विभाग (१४६१) ,मंत्रालय, मुंबई ३२.
९ उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग (कामगार कक्ष), मंत्रालय, मुंबई- ३२.
१० ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.
११ मा. संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
१२ महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई (लेखा व अनुज्ञेयता) लेखा परीक्षा.
१३ महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर (लेखा व अनुज्ञेयता) लेखा परीक्षा.
१४ मुख्य लेखा परीक्षक स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१५ उपमुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण/ पुणे/ नाशिक/ औरंगाबाद/ अमरावती/ नागपूर विभाग.
१६ उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे(पूर्व), मुंबई ५१.

१७ सर्व जिल्ह्याधिकारी.
१८ सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
१९ मुख्य अधिकारी, मुंबई/ कोकण/ पुणे/ नाशिक/ औरंगाबाद/ अमरावी/ नागपूर गृहनिर्माण व क्षेत्र विकास मंडळ.
२० अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२१ निवासी लेखा परीक्षक अधिकारी, मुंबई.
२२ सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
२३ वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे(पूर्व), मुंबई ५१.
२४ उप सचिव, श्रम मंत्रालय, भारत सरकार, जयसलमेर हाऊस, मानसिंग रोड, नवी दिल्ली (रजिस्टर पोष्टाने)
२५ उप सचिव, नगर विकास मंत्रालय, भारत सरकार, जयसलमेर हाऊस, मानसिंग रोड, नवी दिल्ली (रजिस्टर पोष्टाने)
२६ कल्याण व उपकर आयुक्त, कामगार कल्याण संघटना, भारत सरकार सी.जी.ओ. कॅम्प्लेक्स, ब्लॉक सी (दुसरा मजला) सेमिनरी हिल्स, नागपूर-४४० ००६.
२७ सर्व कामगार आयुक्त.
२८ सर्व विभागीय आयुक्त.
२९ सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी.
३० सर्व उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
३५ श्री स्वामी समर्थ विडी कामगार सहकारी गृहनिर्माण संस्था, सोलापूर, मौजे.कुंभारी, जि.सोलापूर.
३६ अर्थसंकल्प-१/रोखशाखा, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ३२.
३७ निवड नस्ती गृनिधो-१.